**सन २०१८-१९ मध्ये बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेची (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) अंमलबजावणी करण्यास प्रशासकिय मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१२७/३अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १७ जुलै, २०१८

**वाचा:**

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. आऊयो-२४१६/प्र.क्र.१७७/४-अे, दि. ९/८/२०१७

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. आऊयो-२४१७/प्र.क्र.१२७/३-अे, दि. ३०/८/२०१७

३) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, यांचे पत्र क्र. विप्र-७/बि.मुं.कृ.क्रां.यो./ शानि/ ४४५/२०१८, दि. २५ मे, २०१८

**प्रस्तावना:-**

राज्यातील अनुसूचित जमातीतील शेतकऱ्यांच्या उत्पन्नात वाढ करुन त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी तसेच त्यांना स्वयंपूर्ण करण्यासाठी आवश्यक बाबी विचारात घेऊन संदर्भाधीन दि. ९ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजना सुधारित करण्यात आली आहे. संदर्भाधीन दि. ३० डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रस्तुत आदिवासी उपयोजना सुधारित करून बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) राज्यात राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत रु. १.५० लाख मर्यादेपर्यंत वार्षिक उत्पन्न असणाऱ्या अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतकऱ्यांना "नवीन विहीर खोदणे, जुनी विहीर दुरुस्ती, इनवेल बोअरिंग, वीज जोडणी आकार, पंप संच, पिव्हीसी/एचडीपीई पाईप, शेत तळयांचे प्लास्टीक अस्तरीकरण, परस बाग, सूक्ष्म सिंचन संच" या बाबींसाठी अनुदान देण्यात येते.

सन २०१८-१९ करिता आदिवासी विकास विभागाने योजनेंतर्गत क्षेत्राबाहेरील कार्यक्रमासाठी रु. १८२२.३९ लक्ष व क्षेत्रांतर्गत कार्यक्रमासाठी रु. ६५०८.८० लक्ष असा एकूण रु. ८३३१.१९ लक्ष निधी जिल्हास्तरावर उपलब्ध करुन दिला आहे. चालू वर्षासाठी सदर निधीच्या मर्यादेत योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड करून योजनेंतर्गत कार्यक्रमाच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय:**

१. सन २०१८-१९ मध्ये अनुसूचित जमातीतील शेतकऱ्यांसाठी बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील), क्षेत्राबाहेरील उपयोजनेसाठी रु. १८२२.३९ लाख (रुपये अठरा कोटी बावीस लाख एकोणचाळीस हजार फक्त) आणि क्षेत्रांतर्गत उपयोजनेसाठी रू. ६५०८.८० लाख (रूपये पासष्ठ कोटी आठ लाख ऐंशी हजार फक्त) याप्रमाणे एकूण रू. ८३३१.१९ लाख (रुपये त्र्याऐंशी कोटी एकतीस लाख एकोणीस हजार फक्त) निधी मंजुरीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेकरिता आदिवासी विकास विभागामार्फत संबंधित जिल्हा परिषदांना निधी वितरीत करण्यात येईल आणि योजनेच्या अंमलबजावणीस वित्तीय मान्यता संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात यावी.

३. योजनेसाठी चालू वर्षी मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत जिल्हास्तरावर योजनेची अंमलबजावणी करावी. योजनेंतर्गत चालू वर्षी जिल्हानिहाय मंजूर केलेल्या तरतुदींचा तपशील व लेखाशीर्ष सोबत जोडलेल्या परिशिष्ट अ व ब येथे नमूद असून सदर योजनेचा निधी चालू वर्षी संबंधित लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या निवडीसाठी नवीन विहिरीसाठी किमान ०.४० हे. क्षेत्र मर्यादा लागू राहील व नवीन विहीर खोदणे ही बाब वगळून योजनेतील अन्य बाबींसाठी किमान ०.२० हे. क्षेत्र मर्यादा लागू राहील आणि योजनेंतर्गत सर्व बाबींसाठी कमाल ६ हे. क्षेत्र मर्यादा लागू राहील.

५. परंपरागत वन निवासी (वन अधिकार मान्यता) अधिनियम, २००६ नुसार वनपट्टे धारक शेतकऱ्यांची या योजनेंतर्गत प्राधान्याने लाभार्थी म्हणून निवड करावी व त्यानंतरच अन्य शेतकऱ्यांची लाभार्थी म्हणून निवड करण्यात यावी.

६. या योजनेंतर्गत १० अश्व शक्ती क्षमतेपर्यंतचे पंप संच (डीझेल/ विद्युत) तसेच, पिव्हीसी पाईपकरिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत मंजूर असलेल्या मापदंडानुसार लाभार्थ्यांना १००% अनुदान अदा करावे.

७. या योजनेच्या लाभार्थ्यांना सूक्ष्म सिंचन संचाकरिता मंजूर मापदंडानुसार येणाऱ्या खर्चा पैकी कमाल ५५% अनुदान प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक योजनेतून देण्यात येईल व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेच्या (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) तरतुदीतून ३५% अनुदान (कमाल रु. ५०,०००/- मर्यादेपर्यंत) देण्यात येईल-

  I. लाभार्थ्यांचा ठिबक सिंचन संच बसविण्याचा मंजूर मापदंडानुसार एकूण खर्च रु. १,५८,७३०/- (रुपये एक लाख अठ्ठावन्न हजार सातशे तीस फक्त) वा त्यापेक्षा कमी झाल्यास लाभार्थ्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) या दोन योजनांच्या माध्यमातून ९०% अनुदान अदा करण्यात येईल.

  II. लाभार्थ्यांचा मंजूर मापदंडानुसार एकूण खर्च रु. १,५८,७३०/- पेक्षा जास्त झाल्यास, त्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक योजनेतून मापदंडानुसार ५५% अनुदान देण्यात येईल व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेच्या (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) तरतुदीतून रु. ५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त) अनुदान देण्यात येईल.

  III. लाभार्थ्यांचा तुषार सिंचन संच बसविण्याचा मंजूर मापदंडानुसार एकूण खर्च रु. ७९,३६५/- (रुपये एकोणऐंशी हजार तीनशे पासष्ठ फक्त) वा त्यापेक्षा कमी झाल्यास, लाभार्थ्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) या दोन योजनांच्या माध्यमातून ९०% अनुदान अदा करण्यात येईल.

IV. लाभार्थ्यांचा खर्च रु. ७९,३६५/- पेक्षा जास्त झाल्यास, त्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक योजनेतून मापदंडानुसार ५५% अनुदान देण्यात येईल व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेच्या (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) तरतुदीतून रु. २५,०००/- (रुपये पंचवीस हजार फक्त) अनुदान देण्यात येईल.

८. **सदर योजनेची तसेच योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनासाठी ९० % अनुदान उपलब्ध असल्याची** जिल्हास्तरावरून व्यापक प्रसिद्धी करण्यात यावी. त्याकरिता जिल्हा कृषि विकास अधिकाऱ्यांनी जिल्हयातील प्रमुख वृत्तपत्रांमध्ये या योजनेंतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या बाबी व त्याकरिता मिळणारे अनुदान याच्या सविस्तर तपशिलासह जाहिरात प्रसिद्ध करून योजनेंतर्गत उपलब्ध बाबींसाठी इच्छूक शेतकऱ्यांना अर्ज करण्यास सूचित करण्यात यावे.

९. या योजनेंतर्गत चालू वर्षी जिल्हयांना उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या निधीचे समन्यायी पद्धतीने तालुका निहाय वाटप करावे. त्याकरिता, **कृषि गणनेनुसार जिल्हयातील एकुण अनुसूचित जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांपैकी संबंधित तालुक्यातील सदर प्रवर्गाच्या शेतकऱ्यांच्या संख्येच्या प्रमाणात प्रत्येक तालुक्यांचा आर्थिक लक्षांक निश्चित करावा** व सदर लक्षांकाच्या मर्यादेत संबंधित तालुक्यातील इच्छुक शेतकऱ्यांमधून पात्र लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

१०. योजनेंतर्गत महा-ऑनलाईन या संकेतस्थळावर अर्ज करण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहे, त्याद्वारे इच्छूकांना **अर्ज करण्याकरिता किमान १ महिन्यांचा कालावधी द्यावा.**

११. संबंधित तालुक्याच्या आर्थिक लक्षांकापेक्षा अधिक अर्ज प्राप्त झाल्यास जिल्हा निवड समितीने लाभार्थ्यांची सोडत पद्धतीने निवड करावी. ही सोडत प्रकिया अर्जदारांच्या व लोक प्रतिनिधींच्या उपस्थितीत जिल्हास्तरावर तालुका निहाय राबवावी. अशाप्रकारे, सोडतीद्वारे प्रत्येक तालुक्यातील लाभार्थ्यांची निवड यादी तसेच, प्रतिक्षा यादी क्रमवारीनुसार प्रसिद्ध करावी. सदर तालुका निहाय या द्यांच्या प्रती पंचायत समिती व जिल्हा परिषदेच्या सूचना फलकावर लावावी तसेच, जिल्हा परिषदेच्या संकेत स्थळावर देखील प्रसिद्ध करावी.

१२. सोडतीद्वारे **नवीन विहीर व जुनी विहीर दुरुस्ती** या बाबींसाठी निवडलेल्या लाभार्थ्यांना त्यांची **निवड झाल्याबाबत सोडती नंतर ७ दिवसांत लेखी सूचनेद्वारे कळवावे.** तदनंतर लाभार्थ्यांच्या प्रक्षेत्राची स्थळ पाहणी करावी आणि तांत्रिक व्यवहार्यता तपासणी अंती, लाभार्थ्यांचे नवीन विहिर खोदावयाचे ठिकाण तसेच, लाभार्थ्यांच्या जुन्या विहिर दुरुस्तीचे प्रस्ताव तांत्रिकदृष्ट्या योग्य असल्याचे आढळल्यास, सदर बाबींचे अंदाजपत्रक मंजूर करून संबंधित लाभार्थ्यांच्या प्रस्तावांना **पूर्वसंमती देण्याची कार्यवाही सोडतीच्या दिनांकापासून ४५ दिवसाच्या आत करावी.** त्याचप्रमाणे, स्थळ पाहणीमध्ये ज्या लाभार्थ्यांचे प्रस्ताव तांत्रिकदृष्ट्या अयोग्य आढळतील त्यांची निवड रद्द करावी व प्रतीक्षा यादीतील पात्र असणाऱ्या पुढील लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

१३. योजनेंतर्गत नवीन विहीर व जुनी विहीर दुरुस्ती याबाबींशिवाय **अन्य बाबींसाठी निवड झालेल्या लाभार्थ्यांना सोडतीनंतर ७ दिवसांतपूर्व संमती देण्यात यावी** व त्यांना योजनेचा लाभ चालू आर्थिक वर्षातच द्यावा.

१४. योजनेंतर्गत बाबींची विहित कालावधीत अंमलबजावणी न करणाऱ्या लाभार्थ्यांची पूर्वसंमती रद्द करण्यात यावी व तदनंतर प्रतिक्षा यादीतील क्रमवारीनुसार पात्र असणाऱ्या पुढील लाभार्थ्यांची

निवड करावी. अशाप्रकारे सदर योजने अंतर्गत लाभार्थ्यांची पारदर्शक पद्धतीने निवड करून योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

१५. सदर योजनेंतर्गत नवीन विहीर खोदणेसह अन्य सर्व बाबींची एकत्रितपणे अंमलबजावणी करणाऱ्या लाभार्थ्यांना कमाल २ वर्षांचा कालावधी अनुज्ञेय राहील.

१६. नवीन विहीर खोदण्याव्यतिरिक्त अन्य बाबींकरिता निवडलेल्या लाभार्थ्यांना चालू आर्थिक वर्षातच संबंधित बाबींची अंमलबजावणी पूर्ण करणे बंधनकारक राहील.

१७. सदर योजनेंतर्गत जिल्ह्यास / तालुक्याकरिता प्राप्त होणाऱ्या आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेतच लाभार्थ्यांना पूर्व संमती देण्यात यावी.

१८. बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) सूक्ष्म सिंचन संचाकरिता निवड झालेल्या सर्व लाभार्थ्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक योजनेंतर्गत पूरक अनुदान उपलब्ध करुन देण्याकरिता कृषि विकास अधिकाऱ्यांनी संबंधित लाभार्थ्यांचे ई-ठिबक प्रणालीवर अर्ज भरून घ्यावेत व सदर लाभार्थ्यांची यादी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना मंजूरी करिता पाठवावी.

१९. बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) ई- ठिबक प्रणालीवर अर्ज केलेल्या लाभार्थ्यांच्या प्रस्तावांना जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांनी प्राधान्याने मंजूरी देऊन त्यांना प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक योजनेंतर्गत अनुज्ञेय पूरक अनुदान उपलब्ध करुन द्यावे. त्याचप्रमाणे, त्यांनी पूरक अनुदान वर्ग केलेल्या लाभार्थ्यांची यादी कृषि विकास अधिकाऱ्यांना पाठवावी जेणेकरून सदर लाभार्थ्यांना बिरसा मुंडा कृषि क्रांती योजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील) अनुज्ञेय ठरणारी अनुदानाची रक्कम अदा करणे त्यांना शक्य होईल.

२०. योजनेंतर्गत बाबींच्या अनुज्ञेय अनुदांची रक्कम लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर इलेक्ट्रॉनिक पद्धतीने वर्ग करावी.

२१. सदर योजनेची जिल्हा परिषदेमार्फत अभिकरण योजना म्हणून अंमलबजावणी करण्यात यावी . त्याकरिता जिल्हा परिषदेकडील कृषि विभाग व राज्य शासनाच्या कृषि विभागाच्या समन्वयाने अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने आयुक्त (कृषि) यांनी क्षेत्रीय यंत्रणांना सविस्तर सूचना निर्गमीत करावयात त्यामध्ये, योजनेंतर्गत प्रत्येक बाबीच्या अंमलबजावणीची कालमर्यादा विहित करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१७१७११०९०१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.07.17 17:12:26 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२. मा.राज्य मंत्री (कृषि),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व विधान परिषद / विधान सभा सदस्य, महाराष्ट्र राज्य विधान मंडळ, मुंबई.
४. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
५. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. प्रधान सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक
९. व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रतीसह)
११. संचालक (फ़लोत्पादन ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ (सर्व)
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आदिवासी उप आयुक्त
१४. अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती
१५. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१६. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ (सर्व)
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आदिवासी उप आयुक्त (सर्व)
१८. जिल्हा परिषदांचे मुख्य वित्त व लेखा अधिकारी (सर्व)
१९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
२०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२१. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२२. महासंचालक माहिती व जनसंपर्क सचालनालय, मुंबई.
२३. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर-१/२
२४. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर१/२
२५. वित्त विभाग( कार्यासन -व्यय १/अर्थसंकल्प १३) , मंत्रालय, मुंबई -३२
२६. नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई- ३२
२७. निवड नस्ती (कार्यासन ३अे)

# परिशिष्ट - अ

(कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१२७/३-अे, दि. १७.०७.२०१८ सोबतचे विवरणपत्र)
बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना-क्षेत्राबाहेरील कार्यक्रमासाठी जिल्हानिहाय वार्षिक लक्षांक

(रु. हजारात)

| मागणी क्र - टी-९ | | | | |
|---|---|---|---|---|
| २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती , इतर मागासवर्ग व | | | | |
| ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना | | | | |
| ३३ - जिल्हा योजना | | | | |
| Sub scheme : TD०३०००१ - Distribution of inputs for farmsregional improved tools and equipments plan (otsp) (बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना क्षेत्राबाहेरील) | | | | |
| अ.क्र. | योजना कोड | बाब | जिल्हा | रक्कम |
| १ | २२२५E४०९ | ३३ | पालघर | १०००.०० |
| २ | २२२५E२६७ | ३३ | लातूर | १०००.०० |
| ३ | २२२५E२४९ | ३३ | नांदेड | १५७३९.०० |
| ४ | २२२५E२८५ | ३३ | हिंगोली | १८०००.०० |
| ५ | २२२५E२३१ | ३३ | परभणी | ५००.०० |
| ६ | २२२५E२५८ | ३३ | बीड | ५००.०० |
| ७ | २२२५E२२२ | ३३ | जालना | १५००.०० |
| ८ | २२२५E२११ | ३३ | औरंगाबाद | १५००.०० |
| ९ | २२२५E३३८ | ३३ | गडचिरोली | ७०८९.०० |
| १० | २२२५E३२९ | ३३ | चंद्रपूर | १८७०३.०० |
| ११ | २२२५E३११ | ३३ | भंडारा | ४०००.०० |
| १२ | २२२५E३०२ | ३३ | वर्धा | ८०००.०० |
| १३ | २२२५E२९४ | ३३ | नागपूर | १४०००.०० |
| १४ | २२२५E३७४ | ३३ | यवतमाळ | १०८००.०० |
| १५ | २२२५E३५६ | ३३ | अमरावती | ४७००.०० |
| १६ | २२२५E३९२ | ३३ | वाशीम | ५२४६.०० |
| १७ | २२२५E३६५ | ३३ | अकोला | ७५३३.०० |
| १८ | २२२५E३८३ | ३३ | बुलढाणा | ७२२९.०० |
| १९ | २२२५E११३ | ३३ | पुणे | ६५००.०० |
| २० | २२२५E१९६ | ३३ | अहमदनगर | ५०००.०० |
| २१ | २२२५E१८७ | ३३ | जळगाव | १४५००.०० |
| २२ | २२२५E२०२ | ३३ | नंदूरबार | ११००.०० |
| २३ | २२२५E१७८ | ३३ | धूळे | ५१००.०० |
| २४ | २२२५E१६९ | ३३ | नाशिक | १५०००.०० |
| २५ | २२२५E०८९ | ३३ | रायगड | ३०००.०० |
| २६ | २२२५E०७१ | ३३ | ठाणे | ५०००.०० |
| एकुण | | | | १८२२३९.०० |

# परिशिष्ट-ब

(कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.१२७/३-अे, दि. १७.०७.२०१८ सोबतचे विवरणपत्र)

बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना-क्षेत्रांतर्गत कार्यक्रमासाठी जिल्हानिहाय वार्षिक लक्षांक

(रु. हजारात)

| मागणी क्र - टी-९ | | | | |
|---|---|---|---|---|
| २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व | | | | |
| ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना | | | | |
| ३१ - जिल्हा योजना | | | | |
| Sub Scheme : TD०३०००२ Various agricultural development programme.Plan (बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना क्षेत्रांतर्गत) | | | | |
| अ.क्र. | योजना कोड | बाब | जिल्हा | रक्कम |
| १ | २२२५E०७१ | ३१ | ठाणे | १७५००.०० |
| २ | २२२५E०८९ | ३१ | रायगड | २०००.०० |
| ३ | २२२५E११३ | ३१ | पुणे | १३५००.०० |
| ४ | २२२५E१४२ | ३१ | सोलापूर | १.०० |
| ५ | २२२५E१६९ | ३१ | नाशिक | ७००००.०० |
| ६ | २२२५E१७८ | ३१ | धुळे | १००००.०० |
| ७ | २२२५E१९६ | ३१ | अहमदनगर | ८०००.०० |
| ८ | २२२५E३५६ | ३१ | अमरावती | २८०००.०० |
| ९ | २२२५E२०२ | ३१ | नंदुरबार | ८००००.०० |
| १० | २२२५E२११ | ३१ | औरंगाबाद | १.०० |
| ११ | २२२५E२२२ | ३१ | जालना | १.०० |
| १२ | २२२५E२४९ | ३१ | नांदेड | ११०००.०० |
| १३ | २२२५E२५८ | ३१ | बीड | १.०० |
| १४ | २२२५E२६७ | ३१ | लातूर | १.०० |
| १५ | २२२५E२७६ | ३१ | उस्मानाबाद | ३००.०० |
| १६ | २२२५E३२९ | ३१ | चंद्रपुर | ४९०००.०० |
| १७ | २२२५E३३८ | ३१ | गडचिरोली | १५६४२८.०० |
| १८ | २२२५E३४७ | ३१ | गोंदिया | १६०००.०० |
| १९ | २२२५E३७४ | ३१ | यवतमाळ | ३०५९७.०० |
| २० | २२२५E४०९ | ३१ | पालघर | १५००००.०० |
| २१ | २२२५E१८७ | ३१ | जळगाव | ७४५०.०० |
| २२. | २२२५E२९४ | ३१ | नागपूर | ११००.०० |
| एकूण | | | | ६५०८८०.०० |